केंद्र पुरस्कृत बहुक्षेत्र विकास कार्यक्रमातंर्गत (MsDP)
मान्यता प्राप्त हिंगोली जिल्ह्यातील हिंगोली व
कळमनुरी येथील मान्यता प्राप्त वसतीगृह
बांधकामासाठी राज्य हिश्यांतर्गत मंजूर उर्वरित
अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अविवि-२०१२ /प्र.क्र.१३७(भाग-२)/का.०७,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: - १९/०९/२०१८

**संदर्भ:** १. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.३/१३ (३)/२००८-PP-I, दि.१९/०२/२०१३.
२. शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांक,अविवि-२०१२/प्रक्र.१३७/का.०७, दि.२८/०३/२०१३ व दि. २९/०३/२०१३
३. शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांक, अविवि-२०१२/प्रक्र.१३७(भाग-१) /का.०७ , दि.१४/०९/२०१५
४. शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांक, अविवि-२०१२/प्रक्र.१३७(भाग-१) /का.०७ , दि.१४/०९/२०१५
५. शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांक, अविवि-२०१३/ प्रक्र.१३७(भाग-१) /का.०७ , दिनांक ०४/११/२०१५
६. शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांक, अविवि-२०१३/ प्रक्र.१३७(भाग-१) /का.०७ , दिनांक ०६/०५/२०१६.

**प्रस्तावना :-**

१२ व्या पंचवार्षिक योजनेत केंद्र शासनाच्या अल्पसंख्यांक कार्य मंत्रालयाने बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रमाअंतर्गत (MsDP) गठित शक्तीप्रदान समितीने दि.१३/१२/२०१५ रोजीच्या ६२ व्या बैठकीत हिंगोली व कळमनुरी, जि.हिंगोली येथे मुलांसाठी १०० प्रवेशक्षमतेचे प्रत्येकी ०१ वसतीगृह बांधकामाच्या यासंदर्भात केंद्रशासनाच्या अल्पसंख्यांक कार्य मंत्रालयाने दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने जिल्हाधिकारी, हिंगोली यांच्यामार्फत प्राप्त प्रस्तावांना अनुसरुन, केंद्र पुरस्कृत MsDP अंतर्गत हिंगोली व कळमनुरी (जि.हिंगोली) येथील एकूण दोन वसतीगृहांचे इमारत बांधकामाच्या एकूण रु.६२०.०० लक्ष इतक्या रकमेच्या प्रस्तावास केंद्र शासनाच्या उच्च स्तरीय संनियंत्रण समितीने दि. १३/१२/२०१२ रोजीच्या ६२ व्या बैठकीत मान्यता दिली आहे. या मध्ये केंद्र : राज्य हिस्सा ५०:५० असा आहे. शासन ज्ञापन दि.१४/०९/२०१५ अन्वये हिंगोली व कळमनुरी येथील अनुक्रमे रु.४,३३,३४,१९९/- तसेच ४,३३,४४,३७३/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रसाकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर प्रयोजणासाठी राज्य व केंद्र हिश्यातील पहिला व दुसरा हप्ता असे मिळून एकूण एकूण रु.६२०.०० लाख निधी आतापर्यंत वितरीत करण्यात आला आहे.

शासन ज्ञापन दि.१४/०९/२०१५ अन्वये प्रदान प्रशासकीय मान्यतेनुसार हिंगोली व कळमनुरी येथील वसतीगह बांधकामाकरीता आतापर्यंत रु.३१०.०० लाख (प्रती वसतीगृह) याप्रमाणे एकूण रु.६२०.०० लाख इतकी रक्कम जिल्हाधिकारी, हिंगोली यांना विहित अटींच्या अधिनतेने मंजूर करुन वितरीत करण्यात आली आहे. सदर वितरीत निधी पूर्णपणे खर्च करण्यात आली असून त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हाधिकारी हिंगोली यांनी

अनुक्रमे दि.२१/०३/२०१८ व दि.१३/०८/२०१८ च्या पत्रान्वये सादर केली आहेत. सद्यस्थितीत राज्य हिश्यातील अनुक्रमे रु.१,२३,३४,१९९/- व रु.१,२३,४४,३७३ /- इतका वाढीव निधी अवितरीत आहे. आता या प्रयोजनांसाठी उर्वरित राज्य हिश्यातील वाढीव निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

जिल्हाधिकारी, हिंगोली यांनी मागणी केल्याप्रमाणे जिल्हा हिंगोली येथील हिंगोली व कळमनुरी येथे ०२ वसतीगृह बांधकामासाठी राज्य हिश्श्यातील उर्वरित रु.२,४६,७८,५७२/- लाख इतकी रक्कम खालील तक्त्यातील स्तंभ क्र. (७) प्रमाणे मंजूर करुन वितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे :-

(रू.)

| अ.क्र. | कामाचे नाव | प्रशासकीय मान्यता किंमत | यापूर्वी वितरीत निधी | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | या आदेशाद्वारे वितरीत करावयाचा राज्य हिस्सा |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | हिंगोली,जि.हिंगोली येथे अल्पसंख्यांक १०० मुलांसाठी वसतीगृह इमारत बांधणे | ४,३३,३४,१९९ | ३,१०,००,००० | १,५५,००,००० | १,५५,००,००० | १,२३.३४,१९९ |
| २ | कळमनुरी,जि.हिंगोली येथे अल्पसंख्यांक १०० मुलांसाठी वसतीगृह इमारत बांधणे | ४,३३,४४,३७३ | ३,१०,००,००० | १,५५,००,००० | १,५५,००,००० | १,२३,४४,३७३ |
| | **एकूण** | **८,६६,७८,५७२** | **६,२०,००,०००** | **३,१०,००,०००** | **३,१०,००,०००** | **२,४६,७८,५७२** |

३. जिल्हाधिकारी, हिंगोली यांना हिंगोली व कळमनुरी येथील वसतीगृह बांधकामासाठी राज्य हिश्यातील उर्वरित रु. २,४६,७८,५७२/- इतका निधी सन २०१८-१९ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून वितरित करण्यात येत आहे.

४. उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र.(७) प्रमाणे सन २०१८-१९ या वर्षात बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रमांतर्गत हिंगोली जिल्ह्यातील हिंगोली व कळमनुरी येथील विकासकामांसाठी राज्य हिश्यातील उर्वरित रु. २,४६,७८,५७२/- (दोन कोटी सेहचाळीस लाख अठ्याहत्तर हजार पाचशे बहात्तर मात्र) एवढी रक्कम जिल्हाधिकारी, हिंगोली यांना सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

५. सन २०१८-१९ या वर्षात जिल्हाधिकारी, हिंगोली यांना उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र.(७) प्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या एकूण रकमेच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून सदर रक्कम आहरित व संवितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. जिल्हाधिकारी, हिंगोली यांनी बहुक्षेत्रीय विकास कार्यक्रमांतर्गत विषयांकित ०२ वसतीगृह योजनेकरीता आहरित केलेली रक्कम संबंधित अमंलबजावणी यंत्रणेस रितसर वितरित करावी.

६. सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C च्या मार्गदर्शक तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार कोणताही शासन निर्णय / अटी व शर्तीचा भंग होणार नाही, याची दक्षता संबंधित जिल्हाधिकारी यांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी संबंधित जिल्हाधिकारी यानी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / कार्यालयीन आदेश / वित्तीय नियमावली / सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली / भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचे निरिक्षण अहवाल / वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. तसेच सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

७. अमंलबजावणी यंत्रणा यांनी विषयांकीत ०२ मुलांचे वसती गृह व ०१ मुलींचे बांधकामासाठी केंद्र व राज्य शासनाकडून प्राप्त झालेल्या निधीच्या विनियोगाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे तसेच त्रैमासिक अहवाल (QPR) विहित नमुन्यात (अद्ययावत छायाचित्रांसह) संबंधीत जिल्हाधिकारी यांच्यामार्फत शासनास सादर करावीत. तसेच विभागाच्या Construction tracker प्रणालीवर देखील विषयांकीत वसतीगृह बांधकामाची माहिती वेळोवेळी upload करावी.

८. जिल्हाधिकारी, हिंगोली यांनी विषयांकीत ०२ वसतीगृह बांधकामाबाबत विहित नमुन्यातील निधीच्या विनियोगाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे तसेच त्रैमासिक अहवाल (QPR) (अद्ययावत छायाचित्रासह) शासनास सादर करावीत.

९. सदर योजनेंतर्गत केंद्र हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्र.झेड ई-१, राज्य हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्र.झेड ई-१, मुख्यलेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम अल्पसंख्याक बहुक्षेत्रीय विकास कार्यक्रम ( राज्य हिस्सा) ( कार्यक्रमावरील खर्च ) (२२३५-ए २३१ ) ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

१०. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०७/प्र.क्र.९४/अर्थ-३, दि.३०/०६/२०१७ अन्वये प्रशासनिक विभागांस प्रदान करण्यात आलेल्या अधिकांरानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१८०९२४१४५०३८४४१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh M. Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e786 0201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, 2.5.4.45=032100CD9D66225CED8BAE27E0E12 49D39EC14A54419D0A13504B49333B23F92B 58199, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2018.09.24 14:55:38 +05'30'

**( दि. मा. सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.विभागीय आयुक्त, औरंगाबाद,
२.प्रधान सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग,मंत्रालय,मुंबई.
३. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (बांधकामे), मंत्रालय, मुंबई
४. जिल्हाधिकारी, हिंगोली

५. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
६. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा ) मुंबई/नागपूर.
७. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, औरंगाबाद.
८. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड.
९. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, हिंगोली.
१०. संचालक,तंत्रशिक्षण/व्यवसाय शिक्षण संचालनालय,मुंबई
११. प्राचार्य, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, हिंगोली.
१२. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मुंबई.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा हिंगोली..
१४. वित्त विभाग (अर्थसंकल्प -४/ व्यय -४) मंत्रालय, मुंबई.
१५. नियोजन विभाग (कार्या.१४७५)
१६. निवड नस्ती, का.७.